**महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या अहवाल क्रमांक-५५ मधील शिफारशींनुसार इतर मागासवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील जातींच्या नोंदीमध्ये जातींचा समावेश करणे/वगळणे/जातींच्या नोंदीमध्ये दुरुस्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- आयोग-२०२३/प्र.क्र.३०६/मावक**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २६ मार्च, २०२५.

**वाचा:** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक:सीबीसी-१०/२००८/प्र.क्र.२३५/मावक५, दि.२५.०६.२००८.
२) शासन निर्णय, विमुक्त जाती, भटक्या जमाती व इतर मागासवर्ग आणि विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, क्रमांक: सीबीसी-२०१९/प्र.क्र.७२/मावक, दि.०४.०६.२०१९.
३) शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क्र.३०८/मावक, दि.०९.०१.२०२५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्याच्या इतर मागास वर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गातील जातीच्या यादीमध्ये राज्य मागासवर्ग आयोगाच्या अहवालानुसार वाचा येथे नमूद क्र.१, २ व ३ च्या शासन निर्णय / परिपत्रकान्वये काही नवीन जातींचा अंतर्भाव करुन/वगळून यादी अद्ययावत केलेली आहे.

महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांनी शासनास अहवाल क्रमांक-५५ सादर करुन त्याद्वारे गंणिगा, कची/कच्ची/कच्छी, कोइरी, कोईरी, कोयरी, व कुशवाह आणि धोबी/परीट/वरठी/तेलगु मडेलवार (परीट) या जातीच्या नोंदीमध्ये जातींचा समावेश करणे/वगळणे/जातींच्या नोंदीमध्ये दुरुस्ती करण्याबाबत शिफारस केली आहे. त्यानुषंगाने मा.मंत्रीमंडळाने सदर शिफारसी मान्य केल्या असून सदर मान्यता विचारात घेता, महाराष्ट्र राज्याच्या इतर मागासवर्ग, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाच्या यादीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य मागासवर्ग आयोगाने शासनास सादर केलेल्या अहवाल क्रमांक-५५ मधील शिफारशीनुसार विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या उपरोक्त वाचा येथे नमूद दि.२५.०६.२००८, दि.०४.०६.२०१९ व दि.०९.०१.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रक/निर्णयांन्वये अंतिम करण्यात आलेल्या जाती/तत्सम जातीच्या यादीत बदल करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने अहवाल क्रमांक-५५ मध्ये प्र.क्र.१९/२०१४, प्र.क्र.२९/२०१४, प्र.क्र.१४६/२०२२ अन्वये गंणिगा , कची/कच्ची/कच्छी, कोइरी, कोईरी, कोयरी, व कुशवाह आणि धोबी/परीट/वरठी/ तेलगु मडेलवार (परीट) या पोटजातीच्या नोंदीमध्ये जातींचा समावेश करणे/वगळणे/जातींच्या नोंदीमध्ये दुरुस्ती करण्याबाबत समावेश करण्याबाबत सखोल पडताळणीअंती शासनास अभिप्राय सादर केले आहेत. सदर प्रकरणांबाबतची वस्तुस्थिती व गुणवत्ता विचारात घेऊन खालील तक्त्यात नमूदप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे:-

| **अ.क्र.** | **आयोगाचा प्र.क्र.** | **जातीचे नाव** | **शासनाचा निर्णय** |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | प्र.क्र. १९/२०१४ | गंणिगा ऐवजी गणिगा अशी इतर मागासवर्ग यादीत अनुक्रमांक-३०० वर दुरुस्ती करणेबाबत. | इतर मागास वर्ग यादीत अनुक्रमांक-३०० वर गंणिगा ऐवजी "गाणिगा/गाणिग" अशी जातींच्या नोंदीमध्ये दुरुस्ती करण्यात येत आहे. |
| २ | प्र.क्र. २९/२०१४ | इतर मागास वर्ग यादीत अनुक्रमांक-८५ कची/कच्ची/कच्छी, कोइरी, कोईरी, कोयरी, व कुशवाह | इतर मागास वर्ग यादीत अनुक्रमांक-८५ मधील तत्सम जातीतील कोइरी, कोईरी, कोयरी, व कुशवाह मधील “कोयरी व कुशवाह” येथील “व” वगळण्यात येत आहे. |
| ३ | प्र.क्र. १४६/२०२२ | धोबी, परीट, वरठी, तेलगु मडेलवार (परीट) या एकच जाती असल्यामुळे शासनाच्या इतर मागासवर्ग यादीत अनुक्रमांक-१२५ व अनुक्रमांक-१६६ वरील जाती एकाच अनुक्रमांकावर घेवुन शुध्दीपत्रक काढण्याबाबत. | इतर मागासवर्ग यादीतील अनुक्रमांक-१२५ चे समोर 'वरठी' या जाती समुहाची नोंद घेण्यात येत आहे. तसेच इतर मागासवर्ग यादीतील अनुक्रमांक-१६६ वरील “वरठी” ही नोंद वगळण्यात येत आहे. |

०३. सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेले बदल हे शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

०४. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२५०३२६१३०३१६७९३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by RAVINDRA RAMDAS PETKAR
Date: 2025.03.26 13:05:58 +05'30'

**( र. रा. पेटकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
३. मा. अध्यक्ष, विभानसभा यांचे खाजगी सचिव.

४. मा. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव व प्रधान सचिव.
५. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास व गृहनिर्माण..) यांचे खाजगी सचिव,
६. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन..) यांचे खाजगी सचिव,
७. मा. विरोधी पक्षनेते, विधानसभा/ विधान परिषद यांचे खाजगी सचिव.
८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव.
९. सर्व मा.पालकमंत्री तथा मंत्री यांचे खाजगी सचिव.
१०. मा. मुख्य सचिव यांचे सह/उप सचिव.
११. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना सूचना द्याव्यात.

१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१३. महालेखापाल, लेखपरीक्षा व लेखाअनुज्ञेयता, महाराष्ट्र-१. मुंबई.
१४. महालेखापाल, लेखपरीक्षा व लेखाअनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर.
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. सर्व मुख्य महानगर दंडाधिकारी.
१७. सर्व विभागीय आयुक्त.
१८. सर्व जिल्हा दंडाधिकारी.
१९. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२०. सर्व उप विभागीय अधिकारी (महसूल) तथा उप विभागीय दंडाधिकारी.
२१. सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी तथा तहसिलदार.
२२. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई.
२३. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.
२४. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ, नागपूर.
२५. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ, नागपूर.
२६. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा खंडपीठ, औरंगाबाद.
२७. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा खंडपीठ, औरंगाबाद.
२८. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
२९. संचालक, उच्च व तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३०. संचालक, माध्यमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३१. संचालक, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३२. संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३३. संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
३४. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे.
३५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३६. महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, (बार्टी) पुणे.

त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त शासन निर्णयाच्या अनुषंगाने जात प्रमाणपत्र व जात पडताळणी संदर्भातील पोर्टल अद्ययावत करावे.

३७. उप आयुक्त तथा सदस्य, विभागीय जात पडताळणी समिती (सर्व जिल्हे).
३८. सदस्य सचिव, जिल्हास्तरीय जात पडताळणी समिती (सर्व जिल्हे).

३९. सर्व प्रादेशिक उप संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग.

४०. सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी / सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी.

४१. सर्व सहायक सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग.

४२. सर्व जिल्हा परिषदांचे समाजकल्याण अधिकारी.

४३. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, बृहन्मुंबई/ मुंबई उपनगरे.

४४. निवडनस्ती (मावक).